मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, बृहन्मुंबई या कार्यालयासाठी झेरॉक्स मशीन खरेदीस मंजूरी देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्र. एमसीटी १२०४/१५६१/प्र.क्र.११/परिवहन-५
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक :- २८ जानेवारी, २००५.

शासन निर्णय :- मोटार वाहन कायदा, १९८८ व महाराष्ट्र मोटार वाहन नियम, १९८९ नुसार मोटार अपघात दावा न्यायाधिकरणाने दिलेल्या निकालांच्या प्रती निकाल दिल्यापासून १५ दिवसाच्या आंत अर्जदारास देणे बंधनकारक आहे. तसेच प्रादेशिक परिवहन, पोलीस ठाणे, रुग्णालये यांच्याकडून प्राप्त झालेल्या कागदपत्राच्या नकला वादी व प्रतिवादी यांना देण्यात येतात. कार्यालयीन कामकाजासंबंधात झेरॉक्स प्रती काढणे आवश्यक आहे. या करीता कार्यालयात झेरॉक्स मशीनचे नितांत आवश्यकता आहे. त्यामुळे मोटार अपघात न्यायाधिकरण, बृहन्मुंबई कार्यालयासाठी शासनाच्या दर करारावर असलेल्या मेसर्स किलबर्न या कंपनीकडून किलबर्न मिटा डिजीटल फोटो कॉपीआर केएम-२०३० ही झेरॉक्स मशीन खरेदीसाठी व त्या अनुषंगाने येणाऱ्या खर्चास रु.७६,९६०/- ( रुपये शहात्तर हजार नऊशे साठ फक्त) इतक्या खर्चास शासन मंजूरी देत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दिनांक ११ जुलै, २००१ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग - २, अनुक्रमांक २६, अ नियम क्र. ७६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च २०४१-वाहनावरील कर, ८००(एक) मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, ०५ कार्यालयीन खर्च या शिर्षाखाली सन २००४-२००५ या वित्तीय वर्षात मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( आ. बा. डमाळे )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, बृहन्मुंबई,
महालेखापाल(लेखा परिक्षा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग(व्यय-८)(विनियम), मंत्रालय, मुंबई,
गृह विभाग, बीयुडी-१,
निवडनस्ती.